एकात्मिक बाल विकास सेवा योजनेची प्रभावी अंमलबजावणी व संनियंत्रण होण्यासाठी भरारी पथकाच्या भेटी बाबत .

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग,
शासन निर्णय,क्रमांक :एबाविं २०११ / प्र.क्र.२०१ / का-५,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ४ ऑगस्ट , २०११.

**वाचा:-** १) शासन परिपत्रक महिला व बाल विकास विभाग क्र. एबावि-२००२/प्र.क्र.३८/का-५, दिनांक २१.९.२००२
२) शासन निर्णय महिला व बाल विकास विभाग क्र.एबावि-२००८/प्र.क्र.५९/ का-५, दिनांक २४.८.२००९

**प्रस्तावना** :- एकात्मिक बाल विकास सेवा योजनेची राज्यात प्रभावीपणे अंमलबजावणी व संनियंत्रण होण्यासाठी संदर्भीय शासन परिपत्रक दिनांक २१.९.२००२ अन्वये स्थापन केलेल्या भरारी पथकांच्या कार्यकक्षा मर्यादित असल्यामुळे सदर कार्यकक्षेत सुधारणा करणे, आयुक्त स्तरावर महसूल निहाय भरारी पथक निर्माण करणे आणि क्षेत्रिय स्तरावरील संबंधित अधिका-यांनी याबाबत नियमितपणे अंगणवाडींना भेटी देण्यासाठी उपाययोजना करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :-** शासन परिपत्रक , दिनांक २१.९.२००२ अन्वये मंत्रालयीन स्तरावर स्थापन केलेल्या भरारी पथका मार्फत अंगणवाडयांना भेटी देण्याबाबत दिलेल्या सूचनांमध्ये खालील प्रमाणे अंशतः सुधारणा करण्यात येत आहेत.

**राज्यस्तरावर भरारी पथक रचना खालील प्रमाणे राहील.**

१) सह सचिव / उप सचिव, (एबाविसे ) महिला व बाल विकास , मंत्रालय- पथक प्रमुख

२) अवर सचिव / कक्ष अधिकारी (एबाविसे) महिला व बाल विकास , मंत्रालय- सदस्य

३) सहाय्यक (का-५/ का-६) (एबाविसे) महिला व बाल विकास , मंत्रालय- सदस्य

४) आयुक्त, महिला व बाल विकास , पुणे यांचे एक प्रतिनिधी - सदस्य

**सदर पथकामार्फत यापुढे वर्षातून किमान सहा वेळा राज्यातील अंगणवाडींना भेटी देवून त्याबाबतचा अहवाल मा.प्रधान सचिव व मा. राज्यमंत्री , मा.मंत्री यांना सादर करणे बंधनकारक राहील.**

२. राज्यस्तरावर स्थापन केलेल्या वरील भरारी पथकाव्यतिरिक्त आयुक्त कार्यालयातील एकात्मिक बाल विकास सेवा या योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी नियुक्ती केलेल्या **६ उप आयुक्त यांचे अध्यक्षतेखाली कोकण- मुंबई ,नाशिक, पुणे, औरंगाबाद , अमरावती व नागपूर या ६ महसूल विभागासाठी भरारी पथके स्थापन करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या पथकामध्ये आयुक्त कार्यालयातील उप आयुक्त, त्यांचे सहाय्यक व संबंधित प्रकल्पाचे बाल विकास प्रकल्प अधिकारी , आणि मुख्य सेविका यांचा समावेश असावा. या संदर्भात महसूल विभागनिहाय भरारी पथकाचे सविस्तर आदेश आयुक्त, महिला व बाल विकास, पुणे यांनी तात्काळ निर्गमित करावेत.** या पथकांनी प्रथमतः ज्या अंगणवाडयांबाबत तक्रारी प्राप्त झालेल्या आहेत, अशा सर्व तक्रारींची प्राधान्याने तपासणी करणे अनिवार्य ठरेल. त्याशिवाय

त्यांना नेमून देण्यात आलेल्या महसूल विभागातील एकूण प्रकल्प व अंगणवाडया विचारात घेवून भेटीचे नियोजन करण्यात यावे. त्याचप्रमाणे अंगणवाडयातील लाभार्थ्यांची प्राप्त होणारी आकडेवारी याबाबत साशंकता निर्माण झाल्यास अशा अंगणवाडयांना भेटी देवून नेमकी वस्तुस्थिती जाणून घ्यावी. आयुक्त स्तरावरील या भरारी पथकाने त्यांना नेमून दिलेल्या महसूल अंगणवाडयामध्ये लाभार्थ्यांना पुरविण्यात येणा-या सोयी सुविधांचा गुणात्मक दर्जा तपासण्यासाठी **महिन्यातून किमान एकदा अचानक भेटीचा कार्यक्रम** आयोजित करून त्या महसूल विभागातील प्रकल्पातील किमान दोन अंगणवाडयांना भेटी देवून त्याबाबतचा अहवाल मा.मंत्री / मा. राज्यमंत्री / प्रधान सचिव / आयुक्त, महिला व बाल विकास यांना सादर करावा. सदर तपासणीमध्ये केंद्र शासनाच्या निर्देशाप्रमाणे ठरविण्यात आलेल्या इष्टांकानुसार अंगणवाडीचा दर्जा अथवा लाभार्थ्यांना देण्यात येणा-या सोयीसुविधामध्ये अभाव अथवा त्रुटी आढळल्यास त्याची तातडीने व गांभीर्याने दखल घेवून भरारी पथकाचे उप आयुक्त यांनी योग्य निर्णय घेवून संबंधितांना तातडीने उचित आदेश दयावेत. उप आयुक्त यांनी त्यांना नेमून दिलेल्या महसूल विभागातील सर्व प्रकल्पांचे मासिक तपासणी अहवाल प्रत्येक महिन्याच्या पाच तारखे पर्यंत मा. मंत्री / मा.राज्यमंत्री / प्रधान सचिव व आयुक्त, महिला व बाल विकास यांना सादर करणे बंधनकारक राहील. त्याप्रमाणे जे उप आयुक्त असा अहवाल नियमितपणे सादर करणार नाहीत, त्यांच्या गोपनीय अहवालात नोंद घेण्याबाबत आयुक्त यांनी कार्यवाही करावी आणि जे अधिकारी सलग तीन महिने आपला मासिक तपासणी अहवाल सादर करणार नाहीत, त्यांचे विरूध्द यथोचित शिस्तभंगाची कार्यवाही आयुक्त स्तरावर करावी अथवा त्याबाबतचा सविस्तर प्रस्ताव शासन स्तरावर कार्यवाहीसाठी सादर करावा.

३. **प्रकल्पस्तरावर संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बालकल्याण )** यांना शासन निर्णय दिनांक २४.८.२००९ मधील निर्देशाप्रमाणे **३ महिन्यातून किमान एकदा अंगणवाडी तपासणीचे निर्देश दिलेले आहेत. त्यानुसार त्यांच्या प्रकल्पक्षेत्रातील सर्व अंगणवाडयांना किमान तीन महिन्यातून एकदा याप्रमाणे वर्षातून ४ वेळा भेट देणे त्यांचेवर बंधनकारक राहील.** संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बालकल्याण ) यांनी त्यांच्या प्रकल्पक्षेत्रातील सर्व अंगणवाडयांचा गुणात्मक दर्जा उंचावण्याबाबत आवश्यक तातडीने कार्यवाही करणे व त्याबाबत संबंधितांना निर्देश देणे , आवश्यक तेथे संबंधितां विरूध्द कडक कार्यवाही करणे आणि त्यांच्या कार्यक्षेत्रातील मुख्य सेविका यांनी प्रत्येक अंगणवाडीत महिन्यातून एकदा भेट देत आहेत किंवा नाही याची खातरजमा करणे बंधनकारक राहील. त्याबाबतचा मासिक अहवाल प्रत्येक महिन्याच्या पाच तारखेच्या आत आयुक्त यांना सादर करणे बंधनकारक राहील. आयुक्त स्तरावर त्या त्या महसूल विभागासाठी नियुक्त केलेल्या भरारी पथकाचे प्रमुख उप आयुक्त यांनी त्यांच्या महसूल विभागातील सर्व प्रकल्पांचे अहवाल प्रत्येक महिन्याच्या पाच तारखे पर्यंत प्राप्त करून घेण्याबाबत पाठपुरावा करतील आणि प्राप्त अहवाल व शिफारशीच्या अनुषंगाने आयुक्त यांच्या मान्यतेने तातडीने उचित निर्णय घेतील. जे बाल विकास प्रकल्प अधिकारी व उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बालकल्याण) असा अहवाल नियमितपणे सादर करणार नाहीत, त्यांच्या गोपनीय अहवालात नोंद घेण्याबाबत आयुक्तांकडे लेखी शिफारस करतील व जे नागरी प्रकल्पातील अधिकारी सलग

तीन महिने आपला मासिक तपासणी अहवाल सादर करणार नाहीत त्यांची एक वेतनवाढ रोखण्या बाबत आयुक्त स्तरावर कार्यवाही करण्यात येईल. ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील अधिका-या विरूध्द वरील प्रमाणे कार्यवाहीचा प्रस्ताव नियमानुसार ग्राम विकास विभागाकडे आयुक्त यांनी सादर करावा.

४. **मुख्य सेविका / पर्यवेक्षिका यांनी त्यांच्या अधिकार क्षेत्रातील सर्व अंगणवाडयांची महिन्यातून किमान एकदा तपासणी करणे बंधनकारक राहील.** अंगणवाडयांची तपासणी केल्यावर त्याबाबतचा अहवाल संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी / उपमुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण) यांना दोन दिवसाच्या आत सादर करण्यात यावा. त्याअनुषंगाने बाल विकास प्रकल्प / उप मुख्य कार्यकारी अधिकारी यांनी सदर अहवालाच्या अनुषंगाने आवश्यक तेथे उचित कार्यवाही तत्परतेने करावी. ज्या मुख्य सेविकेमार्फत त्यांच्या कार्यक्षेत्रातील सर्व अंगणवाडयांचे तपासणी अहवाल प्रत्येक महिन्यात प्राप्त न झाल्यास त्याची नोंद गोपनीय अहवालात घेण्याबाबत संबंधित अधिका-यांने कार्यवाही करावी आणि ज्या मुख्य सेविका अहवाल सादर करण्यास सलग तीन महिने टाळा टाळ करतील, त्यांची किंवा निर्देशांचे पालन करणार नाहीत, त्यांची एक वेतनवाढ रोखण्याबाबत आयुक्त कार्यालयास तातडीने प्रस्ताव सादर करावा.त्याचप्रमाणे ग्रामीण व आदिवासी प्रकल्पातील पर्यवेक्षिकांविरूध्दच्या शिस्तभंगाचा प्रस्ताव आयुक्त यांचेमार्फत सचिव, ग्राम विकास विभाग यांना सादर करावा.

५. **वरील प्रमाणे शासन स्तरावरील व आयुक्त स्तरावरील भरारी पथकाची कार्यकक्षा खालील प्रमाणे राहील.**

१) एकात्मिक बाल विकास सेवा योजनेची प्रभावी अंमलबजावणी व नियंत्रण होण्यासाठी विविध प्रकल्पातील अंगणवाडयांना भेटी देऊन अन्नधान्य, आहार, वजनकाटे व इतर अनुषंगिक बाबींची तपासणी करणे.

२) बालमृत्यू व कुपोषण याबाबत तपासणी करणे,

३) अंगणवाडी कार्यकर्ती व मदतनीस यांचे काम , दैनंदिन हजेरी व त्यांच्या अडीअडचणी याबाबत तपासणी व मार्गदर्शन करणे,

४) बालकांच्या आरोग्य तपासणी बाबतच्या अहवालाची माहिती घेणे ,

५) मुख्य सेविका यांचे कामकाज व त्यांची हजेरी व त्यांच्याकडून होत असलेल्या अंगणवाडी कामकाजाचे निरीक्षण याबाबतची तपासणी करणे,

६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषदा यांच्याबरोबर बालमृत्यू व कुपोषण या संदर्भात संबंधित जिल्हयातील उपाययोजना याबाबत चर्चा करणे ,

७) उप मुख्य कार्यकारी अधिकारी (बालकल्याण) व बाल विकास प्रकल्प अधिकारी यांच्या कार्यालयांची तपासणी करणे,

८) एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत पुरविण्यात येणा-या आहाराचा दर्जा व त्यांचे प्रमाण यांची तपासणी करणे.

९) ICDSअंतर्गत पुरविण्यात येणा-या सहा सेवांची योग्य अंमलबजावणी होते काय याची तपासणी करणे. तसेच,

तपासणीच्या दिनांकापूर्वी शासनाने व आयुक्त, महिला व बालविकास आयुक्तालय,पुणे यांनी १ वर्षापूर्वीपासून दिलेल्या पुरवठा आदेशाप्रमाणे सर्व बाबींचा पुरवठा झाला काय याची खात्री करावी.

१०) वरील भरारी पथकामध्ये भेटीच्या वेळी कमीत कमी दोन सदस्य हजर राहणे आवश्यक राहील.

६. आयुक्त , महिला व बाल विकास यांनी वरील प्रकारे आयुक्त स्तरावरील उप आयुक्त यांच्या भरारी पथकांचा मासिक अहवाल आणि क्षेत्रिय अधिकारी यांचा मासिक अहवाल वेळच्या वेळी प्राप्त होईल या दृष्टीने संबंधितांना आवश्यक सूचना दयाव्यात. त्याचप्रमाणे प्राप्त होणा-या अहवालाच्या व शिफारशीच्या अनुषंगाने तातडीने निर्णय घेवून संबंधितांना आवश्यक निर्देश दयावेत. राज्यातील अंगणवाडयामधील लाभार्थ्यांना केंद्र शासनाच्या निर्देशाप्रमाणे आणि निकषाप्रमाणे आवश्यक सोयीसुविधा उपलब्ध करून देण्याच्या दृष्टीने सतत जागृत रहावे . अंगणवाडीमधील गंभीर तक्रारी बाबत आवश्यक तेथे अचानकपणे स्वतः भेटी दयाव्यात आणि राज्यातील कोणत्याही अंगणवाडीमध्ये अपप्रकार घडणार नाहीत, यादृष्टीने आणि लाभार्थ्यांना देण्यात येणा-या सोयीसुविधांचा गुणात्मक दर्जा चांगला राहण्याच्या दृष्टीने संबंधित प्रकल्प अधिकारी, मुख्य सेविका यांचे बरोबर वेळोवेळी व्हिडीओ कॉन्फरन्स आयोजित करून आवश्यक सूचना दयाव्यात व राज्यात या योजनेची योग्य प्रकारे अंमलबजावणी होण्याची दक्षता घेवून तक्रारीस वाव राहणार नाही याबाबत आवश्यक काळजी घ्यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(श.पा.वारे)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा.मंत्री / राज्यमंत्री, महिला व बाल विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
अपर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नगर विकास विभाग / आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, सामाजिक न्याय विभाग/ ग्राम विकास व जलसंधारण विभाग मंत्रालय, मुंबई
आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, पुणे
महासंचालक, राजमाता जिजाऊ माता-बाल आरोग्य व पोषण मिशन, नवी मुंबई
महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
ग्रंथपाल , महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ग्रंथालय, विधान भवन, मुंबई
सर्व जिल्हाधिकारी / सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी ( बाल कल्याण), / सर्व बाल विकास प्रकल्प अधिकारी
महिला व बाल विकास विभागातील सर्व अधिकारी / कार्यासने मंत्रालय, मुंबई / निवड नस्ती (कार्यासन -५)